## श्री. गोळवलकर आणि रा. स्व. संघ यांच्या निमित्ताने / ३

### १. प्रकाश गाडगीळ

चातुर्वर्ण्यव्यवस्थेचा पाठपुरावा मला करायचा नाही. त्यामुळेच 'लवचिक चातुर्वर्ण्यव्यवस्था'ही मला मान्य नाही. 'सामाजिक थर' इतक्याच अर्थाने ही व्यवस्था एकवेळ मान्य करता येईल. गोळवलकरांनाही तेच अभिप्रेत आहे, असे ते केवळ रा.स्व. संघाचे नेते आहेत म्हणूनच मान्य करता येईल. अभ्यासकाने पक्षपाती असता कामा नये, असे प्रस्तुत लेखकाचे मत आहे. चातुर्वर्ण्यव्यवस्था ही कधी काळी लवचिक असेलही, पण अर्वाचीन इतिहास मात्र तसे सांगत नाही. वरिष्ठवर्णीयांनी कनिष्ठवर्णीयांवर अधिकार गाजवला, असे अर्वाचीन इतिहासावरून दिसते. चातुर्वर्ण्याचे हेच स्वरूप बहुजनसमाजापुढे आज तरी येते. त्यामुळेच आपल्या भूमिकेचे स्पष्टीकरण गोळवलकरांनी करायला हवे होते. पण असे स्पष्टीकरण ते करत नाहीत. म्हणूनच गोळवलकरांची भूमिका मला निषेधार्ह वाटते. ही टीका रा.स्व. संघाच्या बाबतीत विधायक ठरेल अशी मला आशा आहे.

व्यवस्थेने समाजविकसनात एकेकाळी फार महत्त्वपूर्ण काम केले आहे. विकास म्हणजे पूर्वीपेक्षा जास्त चांगली अवस्था प्राप्त होणे, ह्याबाबत दुमत नसावे. लोकशाही शासनव्यवस्था ही ह्याच अर्थाने मला विकसित अवस्था वाटते. त्यामुळेच चातुर्वर्ण्यव्यवस्था ही आज टाकाऊ ठरली आहे. विकासप्रक्रियेचे हे चक्र उलटे फिरवणे शक्य आहे का? ईश्वराबद्दल काहीच अनुभव नसल्यामुळे त्याच्याबद्दल बोलता येत नाही, पण मानवाबद्दल आपण निश्चितपणे सांगू शकू की हे सामर्थ्य मानवात निश्चितच नाही. चातुर्वर्ण्यव्यवस्थेचे पुनरुज्जीवन करणे गोळवलकरांना शक्य आहे का? शक्यच नाही, असे म्हणावे लागेल. घरातल्या म्हातारचळ लागलेल्या वडीलधाऱ्या माणसाला जसे आपण खपवून घेतो म्हणून नव्हे, तर ही भूमिका गंभीरपणे दखल घेण्याजोगीसुद्धा नाही, म्हणून गोळवलकरांची उपेक्षा करणे हा यावरील योग्य असा उपाय म्हणता येईल.

वर्णव्यवस्थेबाबतची श्रद्धा अधिक दृढमूल करण्याचे कार्य गोळवलकर करीत आहेत काय? रा.स्व. संघात तरी ही श्रद्धा दृढमूल झालेली नाही, असे म्हणावेसे वाटते. श्रेष्ठ-कनिष्ठतेचा कोणताही संस्कार रा.स्व. संघात करण्यात येत नाही, त्यामुळेच स्पृश्यास्पृश्यतेची भावनाच मुळी निर्माण होण्यापूर्वी मरून जाते. पूर्वास्पृश्यांना बरोबरीची वागणूक देणे, अस्पृश्य म्हणून उपेक्षा न करणे, ह्या घटना स्पृश्यास्पृश्यतेची भावनाच निर्माण होऊ न देण्याच्या क्रियेचा एक अपरिहार्य परिणाम म्हणून घडतात. संघटनेच्या क्षेत्रात तरी स्पृश्यास्पृश्यता नाहीशी करण्यात संघाने यश मिळविले आहे. वर्ध्याच्या संघ-शिबिराला गांधीजींनी भेट दिली. त्यांनी सर्व स्वयंसेवकांना त्यांची जात विचारली. प्रत्येकाने 'हिंदु' ही एक जात सांगितली. रा.स्व. संघाच्या अस्पृश्यता निवारणाच्या कार्यातील यशाला ही घटना पुष्टी देईल. संघ करीत असलेले कार्य ही दीर्घकालावधीत होणारी एक क्रिया आहे, हे एकदा लक्षात घेतले की, पंचेचाळीस वर्षांत संघाने काय केले, हा प्रश्न अप्रस्तुत ठरतो.

गोळवलकरांच्या विचारांची चिकित्सा करताना त्यांना संशयाचा फायदाच काय, पण इतर कोणाचीही सहसा केली जाणार नाही इतकी कठोर चिकित्सा त्यांची करा. पण हे करताना गोळवलकर म्हटले की ते 'प्रतिगामी' असे म्हणून चालणार नाही. त्यांच्याही भूमिकेत काही तात्त्विक तथ्य असले तर ते मान्य केले पाहिजे.

विकासाची प्रक्रिया ही निसर्गनियमाप्रमाणे होत असते. सतत बदलत राहणे हा निसर्गाचा नियम आहे. चातुर्वर्ण्य लोकशाही म्हटली की त्या ठिकाणी विचार, उच्चार, भाषण, इत्यादि स्वातंत्र्ये अपरिहार्यपणे येतात. पण, 'स्वातंत्र्य' म्हणजे काय, याचाही विचार करावासा वाटतो. पारंपरिक पद्धतीची बंधने तोडून विचार करणे, आणि सर्वच प्रकारची बंधने झुगारून देऊन विचार करणे, हे दोन अर्थ 'स्वातंत्र्य' या संकल्पनेत अन्तर्भूत असतात.

संघटनेत मिळणाऱ्या स्वातंत्र्याला स्वाभाविकपणेच काही मर्यादा पडतात. माझे स्वतःचेच उदाहरण जर लक्षात घेतले तर, संघटनात्मक मर्यादांचे उल्लंघन न करता विचार करण्याचे पूर्ण स्वातंत्र्य रा.स्व. संघाने दिलेले आहे, हा माझा मुद्दा लक्षात येण्यास मदत होईल. 'स्वातंत्र्य' हे कधीही पूर्णार्थाने स्वातंत्र्य असू शकत नाही. विचारांमुळे संघटनेचे अस्तित्वच जर धोक्यात येत असेल, तर त्या वेळी स्वातंत्र्य मर्यादित करणे आवश्यक होते. मर्यादित स्वातंत्र्य हे लोकशाहीचे एक लक्षण मानले पाहिजे. सांसर्गिक रोग झालेल्या रोग्याने स्वातंत्र्याच्या नावाखाली लोकसमुदायापासून दूर जाण्याचे नाकारले, तर या वेळी स्वातंत्र्य अबाधित राहील काय? रा.स्व. संघात याच अर्थाने लोकशाही आहे, असे मला म्हणायचे आहे. लोकशाहीची पारंपरिक लक्षणे म्हणजे मतदान, निवडणुका संघात नाहीत. या अर्थाने ही संघटना लोकशाहीवादी नाही. हुकूमशाहीवादी संघटनेत संघटनेच्या तत्त्वज्ञानाच्या विरोधी मते मांडणाऱ्यांना स्थान राहत नाही. रा.स्व. संघात कम्युनिस्ट व मुस्लिम लीग या दोहोंनाही स्थान नाही, ही गोष्ट लक्षात घेतली की, रा.स्व. संघ ही संघटना ही हुकूमशाहीवादीही संघटना आहे असे मी का म्हणतो हे लक्षात येईल.

राष्ट्रपतीनिवडणुकीत काँग्रेसजनांनी सदसद्विवेकबुद्धीने मतदान करण्याची मागणी केलेली होती. राष्ट्रपतीनिवडणूक खटल्यातील साक्षी काळजीपूर्वक अभ्यासल्यानंतर मनावर ठसा उमटतो तो असा की, सदसद्विवेकबुद्धीप्रमाणे मतदान याचा सरळसरळ अर्थ गिरींना मत देण्याचे स्वातंत्र्य असा होता. परिणामी काँग्रेसचे विघटन झाले. आज तो पक्ष विनाशाच्या मार्गावर आहे. सदसद्विवेकबुद्धीच्या मतदानामुळेच काँग्रेसचे विघटन झाले. ही बेशिस्तच होती. त्यामुळेच ‘सदसद्विवेकबुद्धीचा तमाशा' असा शब्दप्रयोग मी केलेला आहे. रा.स्व. संघात या 'सदसद्विवेकबुद्धी'च्या मागणीला म्हणजे संघटना नष्ट करण्याच्या मागणीला मोकळीक दिली तर, जे काँग्रेसचे झाले तेच आमचेही होईल. दुसरे काहीही होणार नाही.

ह्या आक्रमणांचे वैशिष्ट्य असे की, या आक्रमकांनी आपल्याबरोबर एक निराळा ध्येयवाद आणला, एक निराळे तत्त्वज्ञान आणले. 'पॅन इस्लामिझम्' असे ह्या आक्रमणाचे वर्णन केले तर ते चूक ठरू नये. जित व जेते असे हिंदु-मुस्लिमांचे नाते होते. त्यामुळेच समाजजीवनाशी समरस होणे मुस्लिमांना फार जड जाते. ब्रिटिशांनी मुस्लिमांना समाजजीवनाशी समरस होऊ दिले नाही. स्वातंत्र्यानंतरचे काँग्रेसपक्षाचे धोरणही ब्रिटिशांपेक्षा निराळे नव्हते. निवडणुकीत हुकमी मते मिळावीत म्हणून काँग्रेसनेही मुस्लिमांना समाजाशी समरस होऊ दिले नाही. किंबहुना मुस्लिम जातीयवाद काँग्रेसने जोपासला. समाजाशी समरस होणे म्हणजे काय, तर बाकीचे समाजघटक आनंदोत्सव करीत असता आपण सुतकी चेहरे करून बसता कामा नये, आपल्याप्रमाणे धर्मस्वातंत्र्य इतरांनाही आहे, ही गोष्ट मान्य करणे व इतरांच्या धार्मिक कार्यक्रमांमध्ये अडथळा न आणणे. मुस्लिमांचा धर्म, संस्कृती ही इतरांपेक्षा पूर्णपणे निराळी आहे. असे असूनही मुस्लिम भारताशी एकनिष्ठ राहू शकतात, ही शक्यता मला गृहीत धरायची आहे. आपल्याला भारताशी समरस व्हावेच लागेल, कारण जगात इतरत्र कोठेही भारतातल्या मुस्लिमांना किंमत नाही, ही जाणीव मुस्लिमांना झाली पाहिजे. हे भारतीयीकरणानेच घडेल, असे मला म्हणायचे आहे. भारतीयीकरण म्हणजे काय, तर भारतात राहणाऱ्या यच्चयावत लोकांमध्ये, भारत हा देश आपला आहे, या देशाशी आपण काही तरी देणे लागतो, ही भावना निर्माण करणे. भारतीयीकरण म्हटले त्याचा अर्थ धर्मांतर करणे असा नाही. प्रत्येकजण आपआपल्या धर्मात राहूनही 'भारतीय' म्हणून निराळे जीवन जगू शकतो.

नानासाहेब गोऱ्यांनी सांगितलेली एक गोष्ट मला आठवते. गोविंदवल्लभ पंतांची अन्त्ययात्रा निघाली होती. अन्त्ययात्रेनंतर एका मुस्लिम खासदाराच्या घरी नानासाहेब गप्पा करीत होते. तो मुस्लिम मित्र सांगत होता, "आज मी एका गोष्टीने फार अस्वस्थ झालो आहे. माझा आठ-दहा वर्षांचा लहान मुलगा मला म्हणाला, 'पंतजी खरंच खूप मोठे होते?” “हो तर!” मी म्हणालो. “पण शेवटी ते नरकातच जाणार ना?” मी चमकून विचारले, “का बरं?” मुलगा म्हणाला, “सगळे काफीर मरणानंतर नरकातच जात असतात.”

मुस्लिम समाजात होणाऱ्या विषारी प्रचाराचा हा एक नमुना म्हणता येईल. हा प्रचार भारतीयीकरणाने थांबेल, अशी आशा करण्यास जागा आहे. आपण भारतीय आहोत. भारतावर मुस्लिमांची आक्रमणे सतत होत राहिली. ही भावना एकदा निर्माण झाली की, 'काफरांना इस्लामी बनविले पाहिजे' ही भावनाही नष्ट होईल. भारतीयत्वाची भावनाच नसेल तर नागरिकत्वाची जबाबदारी उचलणे मुस्लिमांना कसे शक्य होईल?

भारतीयीकरण फक्त मुस्लिमांचेच नको, तर सतत रशिया व चीनकडे डोळे लावून बसलेल्या उजव्या आणि डाव्या कम्युनिस्टांचेही झाले पाहिजे. हिंदुधर्मीय असूनही परदेशांकरिता हेरगिरी करणाऱ्या हिंदूंचेही झाले पाहिजे, असा आमचा आग्रह आहे.

समाजजीवनाला बाधक असलेली प्रत्येक कृती ही राष्ट्रद्रोही कृती मानता येईल. व्यक्तीजीवन हे समूहजीवनाशी समव्याप्त असावे लागते, आणि समूहजीवन हे समाजजीवनाशी समव्याप्त असावे लागते. तसे झाले नाही, तर संपूर्ण समाजालाच धोका निर्माण होतो. रस्त्याच्या डाव्या बाजूने चालणे हा सामाजिक नियम आहे. पण, 'मी रस्त्याच्या उजव्या बाजूनेच चालणार' असा कोणी हट्ट धरला तर? आज भारतापुढे लोकसंख्यावाढीचा प्रश्न आ वासून उभा आहे. मुस्लिम समाजातील बहुपत्नीत्वाची चालही त्यामुळेच समाजविरोधी आहे. मुस्लिमांच्या धर्मस्वातंत्र्यात ढवळाढवळ म्हणून नव्हे तर ही चाल समाजहितविरोधी आहे म्हणून मोडून काढली पाहिजे, असे म्हणणे चूक होईल का? समान नागरिकत्वाची मागणी जेव्हा आम्ही करतो तेव्हा त्याचा अर्थ समाजजीवन धोक्यात येता कामा नये, असा असतो.

मुस्लिम जातीयवादाची प्रतिक्रिया म्हणून निर्माण झालेला हिंदु जातीयवाद ही एक नैसर्गिक क्रिया आहे. दोन गुणिले दोन बरोबर चार हे गणितामध्ये जितके खरे तितकेच हल्ला झाला असता त्याचा प्रतिकार होणे हेही खरे आहे. माझे विवेचन काळजीपूर्वक वाचले तर लक्षात येईल की, मुस्लिम जातीयवादाच्या मूळ क्रियेचा भयंकरपणा मला दाखवायचा आहे. ही मूळ क्रियाच जर बंद पडली, तर प्रतिक्रियाही आपोआपच बंद पडेल.

आम्ही 'सेक्युलॅरिझम'चा स्वीकार केला आहे. पण भारत हे खरोखरच सेक्युलर-राष्ट्र आहे का? सेक्युलॅरिझमच्या अनेक अर्थांपैकी इहलोकवादी असा त्याचा एक अर्थ आहे. देशातील हिंदु-मुस्लिम जनतेचे जीवन शांततामय राहावे या हेतूने धर्मनिरपेक्षतेवर या अर्थाने फार भर दिला आहे. सूक्ष्म विचार केला असता, भारत हे सेक्युलर राष्ट्रच नाही, अशा निष्कर्षाला आपल्याला यावे लागते. भारतात हिंदु-मुस्लिमांना धर्मनिरपेक्षतेच्या तत्त्वावर वागविण्यात येत नाही. भिवंडी-जळगावच्या दंगलींनंतर 'अल्पसंख्याकांमध्ये विश्वासाचे वातावरण निर्माण झाले पाहिजे' हे पंतप्रधानांचे वक्तव्य या विधानाला पुष्टीच देईल. हिंदूंना घटनेने दिलेले धर्मस्वातंत्र्य उपभोगता येत नसताना, भारत सेक्युलर राष्ट्र आहे, असे कसे म्हणता येईल?

मुस्लिमांना झुकते माप देणे हे एका विशिष्ट मर्यादेपर्यंत मान्य करता येईल. पण याचा अर्थ हिंदूंवर अन्याय करणे, हे श्री. पळशीकरांना मान्य आहे का?

### २. श्री. वसंत पळशीकर

श्री. गोळवलकर यांची चातुर्वर्ण्यव्यवस्थेसंबंधीची भूमिका निषेधार्ह ठरवून रा.स्व. संघास श्री. गोळवलकर यांच्यापासून श्री. गाडगीळ यांनी एकदा वेगळे केले की प्रश्न बराच सरळ होतो. पण 'सामाजिक थर' या अर्थाने श्री. गोळवलकरांना ती व्यवस्था अभिप्रेत आहे, असा संशयाचा फायदा देण्यास खुद्द श्री. गोळवलकरांनी जागा ठेवलेली नाही. रा.स्व. संघाचे नेते असले तरी या बाबतीत दया वा माया दाखविण्यास श्री. गोळवलकरांनी श्री. गाडगीळांना जागा ठेवलेली नाही.

संघात 'श्रेष्ठ-कनिष्ठतेचा कोणताही संस्कार करण्यात येत नाही, त्यामुळेच स्पृश्यास्पृश्यतेची भावनाच मुळी निर्माण होण्यापूर्वी

मरून जाते' असे श्री. गाडगीळ लिहितात. स्पृश्यास्पृश्यतेची भावना साधारण हिंदू जवळपास जन्मतःच घेऊन येतो हे ते विसरतात. आणि ती भावना गळून पडणे ही फार कठीण गोष्ट आहे. कारण माणसाचे सारे आयुष्य एकाही 'अस्पृश्या"ची जवळीक न होता जाऊ शकते. संघात स्वयंसेवक म्हणून दाखल झालेल्या 'अस्पृश्या'ला संघस्थानी समान वागणूक मिळते असे मानण्यास मी तयार आहे, (महाराष्ट्रापुरते तरी) संघाचे एकंदर ब्राह्मणी वळण लक्षात ठेवूनही. पण 'अस्पृश्य' स्वयंसेवक हा 'आपला' आहे ही भावना त्यामागे असण्याची शक्यता आहे. खरा प्रश्न सर्वसामान्य सामाजिक जीवनातल्या स्पृश्यास्पृश्यतेचा, जातिभेदांचा उच्चनीचतेचा आहे. त्या दृष्टीने एक साधी कसोटी श्री. गाडगीळ यांनी लावून पाहण्यासारखी आहे. स्पृश्यास्पृश्यतेची, उच्चनीचतेची भावना नाहीशी करणे हे ज्या संघटनेच्या कार्याचे वैशिष्ट्य आहे त्या संघटनेतील कार्यकर्त्यांचे काही प्रमाणात तरी आंतरजातीय विवाह घडून येणे हा एक स्वाभाविक परिणाम अपेक्षित आहे. राष्ट्र सेवा दलाच्या कार्यकर्त्यांच्या बाबतीत तसे आढळून येते.

या कसोटीला संघ उतरतो की नाही हे श्री. गाडगीळ यांनी सहज ताडून पाहावे असे मला वाटते.

लोकशाही-हुकूमशाहीबद्दलचे श्री. गाडगीळांचे विवेचन बरोबर नाही. संघटनेच्या चौकटीत शिस्तीचा आग्रह राखणे याला कोणी हुकूमशाही म्हणणार नाही. संघटनेचे सभासदत्व वेचक ठेवण्यानेही सामान्यतः लोकशाहीचा भंग होत नाही. तसेच, सर्व संघटनांचे कामकाज मतदान, निवडणुका, प्रतिनिधित्व या पद्धतीने चालले पाहिजे, तरच त्या लोकशाही संघटना होत हेही खरे नाही. संघ ही हुकूमशाहीवादी विचारप्रणाली उचलून धरणारी संघटना आहे असे म्हटले जाते ते वेगळ्या कारणांसाठी. आपणापेक्षा सर्वस्वी भिन्न मतांच्या लोकांबद्दलच्या सहिष्णू-असहिष्णुतेचा व हुकूमशाहीवादी प्रवृत्तीचा निकट संबंध पोचतो. आपल्यापेक्षा सर्वस्वी भिन्न, विरोधी मूल्यप्रणाली, कार्यक्रम घेऊन कार्य करणाऱ्या संघटनांचे, व्यक्तींचे व समूहांचे लोकशाही सहअस्तित्व मान्य करणे व त्यामुळे स्वतःच्या स्वातंत्र्यावर पडणाऱ्या मर्यादांचे स्वागत करणे लोकशाही संघटनांचे वैशिष्ट्य आहे. संघ ही एक हुकूमशाहीवादी प्रवृत्तीची संघटना आहे असे माझ्यासारख्यांना का वाटते? तर, बहुतेक वेळा संघातील मंडळींची मते व ती मांडण्याची पद्धती ही असहिष्णू प्रवृत्तीची निदर्शक असल्याचा अनुभव येतो. सुदैवाने, श्री. गाडगीळ यांच्यासारखीही सहिष्णु वृत्तीने व पूर्वग्रह बाजूस ठेवून चर्चेस तयार असणारी मंडळी संघात आहेत. मी काय म्हणतो आहे ते पुढील उदाहरणावरून स्पष्ट होईल.

अ.भा. विद्यार्थी परिषद ही प्रामुख्याने, किंबहुना जवळजवळ सर्वस्वी, संघातून संस्कार घेऊन बाहेर पडलेल्या कार्यकर्त्यांनी चालविलेली संघटना आहे हे श्री. गाडगीळ यांना मान्य व्हायला हरकत नाही. या संघटनेचे पुणे शाखेचे मंत्री श्री. प्रकाश जोगदेव यांनी महाराष्ट्रातील नक्षलवादी (व त्यातही डॉ. बेरी) यांच्या अटकेच्या संदर्भात काढलेले व दैनिक 'तरुण भारत' ( पुणे आवृत्ती) मध्ये ता. ३०।७।७० रोजी प्रसिद्ध झालेले पत्रक श्री. गाडगीळ यांनी वाचल्यास त्यांना मी काय म्हणत आहे ते कळेल. पुण्याच्या युवक क्रांति दलाशी संबंधित असलेल्यांबद्दल 'छुपे नक्षलवादी गुंड ' हा शब्दप्रयोग करणे व त्यांना 'ठेचून काढण्या'चे आवाहन करणे या गोष्टी हुकूमशाही प्रवृत्तीच्या निदर्शक आहेत. संघातील सर्व स्वयंसेवक वा पदाधिकारी (वा अ.भा. विद्यार्थी परिषदेतील) अशा वृत्तीचे आहेत असा सरसकट आरोप मी करीत नाही. पण जबाबदार पदाधिकारी व्यक्ती अशी भूमिका औपचारिकरीत्या घेतात व तिला औपचारिक, संघटनात्मक पातळीवरून विरोध होत नाही तेव्हा त्यावरून काही निष्कर्ष काढणे अस्वाभाविक म्हणता येत नाही.

(२) ऐतिहासिक काळात मुस्लिम आक्रमकांनी 'पॅन इस्लामिझम'चा ध्येयवाद व तत्त्वज्ञान येथे आणले काय हा विषय गहन आहे व त्याविषयी सरसकट विधान करणे चुकीचे आहे.

जित व जेते असा दीर्घकाळ संबंध असल्याने "समाजजीवनाशी समरस होणे मुस्लिमांना फार जड जाते." हे विधानही तपासून

पाहण्यासारखे आहे. श्री. बाळ ठाकरे यांचा मुंबईतील दाक्षिणात्यांसंबंधी एक मुख्य आरोप असा होता की ते समरस झालेले नाहीत. त्यांच्या बाबतीत तर जित-जेते असा संबंध नव्हता. कप्पेबंद समाजजीवन हे भारतीय समाजजीवनाचे वैशिष्ट्य आहे, मुस्लिमांचे नाही. पुण्यात 'आंतर भारती' संस्थेच्या गुजराती कार्यक्रमांना श्रोतृवर्ग गुजराती, कन्नड कार्यक्रमांना कानडी, हा एक विदारक अनुभव आहे. एका अवघड सर्वसाधारण प्रश्नाचा एक विशेष घटकप्रश्न म्हणून मुस्लिम अलगपणाकडे पाहणे अधिक फलदायी ठरेल.

व्यक्तिजीवन हे समूहजीवनाशी समव्याप्त असावे लागते, आणि समूहजीवन हे समाजजीवनाशी समव्याप्त असावे लागते; तसे झाले नाही तर संपूर्ण समाजालाच धोका निर्माण होतो, असे श्री. गाडगीळांनी लिहिले आहे. हुकूमशाही समाजसंघटनेचे हेच मध्यवर्ती सूत्र आहे. कारण या सूत्रानुसार कोणीतरी सत्तेच्या जोरावर ठरविलेल्या समाजजीवनाच्या घाटाशी सुसंगत नसेल तेव्हा व्यक्तीला वा समूहांना मतस्वातंत्र्य, संघटनास्वातंत्र्य नाही असे निष्पन्न होते. हीच मुस्कटदाबीची सुरुवात असते. याउलट, एका मर्यादित व किमान क्षेत्रापुरतीच व्यक्ती, समूह व समाज यांची जीवने समव्याप्त असतात, बाकीच्या क्षेत्रात ती समव्याप्त असणे समाजधारणेला बिलकूल आवश्यक नाही, किंबहुना 'व्यक्ती तितक्या प्रकृती' ही गोष्ट लक्षात घेता या मर्यादित क्षेत्रापलीकडे समव्याप्ततेची कक्षा शासनाच्या व दंडसत्तेच्या साहाय्याने वाढविण्याचा विचार व प्रयत्न हे व्यक्तिस्वातंत्र्य व विकास यांना घातक आहेत, हा लोकशाहीचा मूलभूत विचार आहे. व्यक्तिजीवन, समूहजीवन व समाजजीवन 'समव्याप्त' असावे लागते या तत्त्वाचे संघ प्रतिपादन करतो आणि दंडसत्तेच्या आधारे ही समव्याप्तता लादणे तो इष्टच नव्हे कर्तव्यरूप मानतो या गोष्टीत मला संघाची हुकूमशाही प्रवृत्ती दिसते.

आमची भारतीयीकरणाची कल्पना हीच योग्य आहे व ती एक दिवस सर्वांना पटेल, सर्वजण एक दिवस ती अंगिकारतील ही श्रद्धा श्री. गाडगीळांनी बाळगणे मला अजिबात गैर वाटत नाही. त्या श्रद्धेने लोकांचे मतपरिवर्तन करण्याचे कार्य त्यांनी व संघाने करणेही स्वागतार्ह होय. पण ही कल्पना ज्यांना पटलेली नाही अशा व्यक्तींचे, समूहांचे अस्तित्व व कार्य दंडसत्तेच्या जोरावर आपण नष्ट करणार नाही, उद्या शासन हाती आले तरी अशा व्यक्तींचे व संघटनांचे त्यांच्या मतासाठी कार्य करण्याचे, लोकांना आपल्या बाजूने वळविण्याचे स्वातंत्र्य सुरक्षित राखू, थोडक्यात, आपल्याहून भिन्न विचारांच्या लोकांना 'राष्ट्रद्रोही' म्हणणे चूक होय हे प्रांजलपणे कबूल करण्याच्या ठाम भूमिकेवर संघ येत नाही तोपर्यंत ती मूलतः हुकूमशाहीवादी संघटनाच राहते.

'भारतीयीकरण' हा मोठा विषय आहे. कारण वेगवेगळ्या वेळी हा शब्द वेगवेगळ्या अर्थांनी वापरला जात आहे. वेगवेगळ्या व्यक्ती तो वेगवेगळ्या अर्थानी वापरत आहेत. ‘भारतीयीकरण' हा शब्द मी स्वीकारला, समजा, तर हे उघडच आहे की त्याचा माझा अर्थ व प्रा. मधोक यांचा अर्थ महत्त्वाच्या अर्थाने वेगळे असणार. तर मग आम्ही एकच शब्द वापरण्यात अर्थ आहे का? मला वाटते, नाही. हा शब्द न वापरता श्री. गाडगीळ यांनी विस्ताराने तपशीलात आणि नेमकेपणाने जर 'भारतीय मुसलमानां'ची (किंबहुना 'भारतीय' भारतीयाची ) प्रतिमा उभी केली तर ते उपयोगाचे होईल.

कम्युनिस्ट हे भारताला एकनिष्ठ नाहीत असे त्यांनी गृहीत धरले आहे. पण हे गृहीत मला मान्य होत नाही. परदेशी सत्तांची मदत घेणारा तो 'अभारतीय' (श्री. गाडगीळ यांच्या अर्थाने) असे असेल तर अमेरिकेकडून गहू-शस्त्रास्त्रे, रशियाकडून आणखी काही घेणारे, चीनकडून शस्त्रे घेणारे आपण सगळेच एकाच माळेतील मणी ठरतो. कारण, परकीय आर्थिक मदतीच्या आधारे देशात अमूक एका गटाची सत्ता टिकवून धरली जात आहे, एरवी ती कधीच कोलमडली असती, असे दाखवून देणे अशक्य नाही. चीनकडून शस्त्रास्त्रे व गनिमी काव्याने युद्ध खेळण्याचे तंत्र घेऊन त्याद्वारे एका विशिष्ट विचाराची राज्यसत्ता येथे प्रस्थापित करण्याचा प्रयत्न जर 'राष्ट्रद्रोही' म्हणावयाचा असेल, तर अमेरिकेकडून वर्षानुवर्षे गहू व अन्य मदत घेऊन, एरवी एतद्देशीय

'कम्यूनिझम' आला असता तो थोपवून धरणारेही, त्याच मापाने, 'राष्ट्रद्रोही' ठरतात असे गंभीरपणे प्रतिपादन करता येईल असे मला वाटते. नक्षलवादी कम्युनिस्टांना विरोध करावयाला हवा तो ते 'अभारतीय' वा 'अराष्ट्रीय' म्हणून नव्हे; तर आपापल्या मतांचा प्रचार करण्याचे, त्यासाठी संघटन बांधण्याचे, आपल्या मतांच्या बाजूने इतरांचे मन वळविण्याचे स्वातंत्र्य हे लोकशाहीचे प्राणतत्त्वच ते हिंसाचाराने नष्ट करीत आहेत म्हणून. याच न्यायाने ‘कायदा लोकांनी हातात घेण्यास काय हरकत आहे' असे म्हणणाऱ्या, किंवा 'आता हिंदू मार खाणार नाहीत' अशी गर्जना करणाऱ्या, किंवा आम्ही सांगू त्या पद्धतीने जीवन जगून भारतीय बनण्याची सक्ती शासनाच्या द्वारे किंवा अन्य मार्गांनी धाकदपटशा निर्माण करून करू पाहणाऱ्या सर्वांचा कसून विरोध व्हावयास हवा. व त्यांच्यापैकी जे कायदा प्रत्यक्ष हातात घेण्यास प्रोत्साहन देतील किंवा हातात घेऊ पाहतील त्यांना नक्षलवाद्यांना होते तितकेच (किंवा व्हावे असे म्हटले जाते तेवढेच) कठोर शासन व्हायला हवे.

श्री. गाडगीळ यांनी, त्यांच्या समजुतीप्रमाणे जे भारतीयीकरण व्हायला हवे आहे त्याचा प्रचार करावा, त्यासाठी संघटनात्मक प्रयत्न करावा याला माझा अजिबात विरोध नाही. उलट ती गोष्ट स्वागतार्हच होईल. वेगवेगळ्या विचारप्रणाली-मूल्यप्रणालींच्या बैठकांवरून, भारतात एक समरस जीवन निर्माण कसे करावे, त्याचा आकृतिबंध काय असावा यासंबंधी प्रतिपादन होत राहिले म्हणजे परस्परांच्या विचारांची सफाई होऊन, गाडगीळांच्यात व माझ्यातच केवळ नव्हे तर, येथील मुसलमान, ख्रिश्चन, नास्तिक, इ. इ. यांच्यातही एक समान भूमिका निर्माण होण्यास मदत होईल.

श्री. नानासाहेब गोरे यांची आठवण श्री. गाडगीळ यांनी सांगितली आहे. मुसलमान मुलगा जे म्हणाला त्याने श्री. गाडगीळांनी एवढे बिचकायचे कारण मला दिसत नाही. सद्गती प्राप्त करून घेण्याचा फक्त एकच मार्ग आहे असे मानणाऱ्या सर्व धर्मांच्या सनातनी श्रद्धाळू भाविकांची ही एक श्रद्धा असते. विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात ती हास्यास्पद ठरली आहे व ती हसण्यावारी नेण्याच्याच लायकीची आहे. श्री. नानासाहेब गोरे यांनीही जर त्या मुलाच्या म्हणण्यास श्री. गाडगीळ यांच्याप्रमाणेच महत्त्व दिले असेल तर त्यांचेही चुकले आहे असे मी म्हणेन.

मुसलमान धर्मगुरू किंवा मुसलमान जमात इतर 'काफिरां'ना इस्लाम धर्माची दीक्षा त्यांचे हृदयपरिवर्तन करून देऊ पाहत असतील तर त्यांचे स्वागतच आहे. पण त्यात त्यांना अजिबात यश येणार नाही. त्यांचे राज्य होते तेव्हा जी गोष्ट त्यांना (व करावेत याचा आग्रह श्री. गाडगीळांबरोबरच मी पण राखीन. पुढे इथल्या प्रजेस ख्रिश्चन करण्याची किमया ब्रिटिशांनाही) जमली नाही ती आता धर्मप्रभाव ओसरणीला लागलेल्या युगात जमणार आहे या भ्रमात ते (किंवा हिंदूपैकीही कोणी ) राहणार असतील तर आपण त्यांना हसावे, दुसरे काय करणार? हां, ते (किंवा आणखी कोणी) सक्तीने, फसवणुकीने, धाकदपटशाने कोणास मुसलमान करू म्हणतील तर त्यांचा प्रतिवाद शासनाने करण्याची गरज पडेल.

मुसलमान समाजातील बहुपत्नीत्वाच्या चालीचा व लोकसंख्यावाढीचा श्री. गाडगीळ संबंध लावतात हे पाहून मी आश्चर्यचकित झालो. प्रजा किती वेगाने वाढणार ही गोष्ट पुरुष-स्त्री प्रमाण, स्त्रीचा प्रसवकाळ, विवाहाचे वय, रोगराईचे प्रमाण, दुष्काळ, उपासमार यांसारखी संकटे, संततिनियमनाचे प्रयत्न, भ्रूणहत्या, गर्भपान इ. प्रकारांपासून ते संततिनियमनाची साधने वापरण्यापर्यंत यांसारख्या गोष्टींवर अवलंबून आहे; ती, एक पुरुष किती बायका करू शकतो यावर अवलंबून नाही. ‘इंडिया १९६९’ या सरकारी प्रकाशनानुसार १९६१ साली भारतात १००० पुरुषांमध्ये ९४१ स्त्रिया होत्या. याचाच अर्थ असा की, दोन वा अधिक बायका करण्याची प्रथा मुसलमानांमध्ये सरसकट असली तर बऱ्याच, किंबहुना बहुसंख्य मुसलमान पुरुषांना बायकोच मिळत नसली पाहिजे. प्रत्येक मुसलमानाला एकाहून अधिक बायका करून प्रजोत्पत्ती दुप्पट-तिप्पट करणे शक्य होण्यास प्रथम मुसलमानांमध्ये पुरुषांच्या दुपटी-तिपटीने स्त्रिया आहेत असे सिद्ध व्हायला हवे. बहुपत्नीत्वाच्या चालीविरूद्ध, त्याने पुष्कळप्रसंगी

(पण नेहमीच नव्हे) स्त्रीचा - पहिल्या पत्नीचा - अधिक्षेप होतो, तिचे स्वतंत्र व्यक्तिमत्व मारले जाते हा खरा आक्षेप आहे.

संततिनियमनाचा स्वीकार अद्याप येथील बहुजनसमाजाने केलेला नाही. हिंदूंनीही नाही व मुसलमानांनीही नाही. पांढरपेशा मध्यमवर्गातच काही प्रमाणात त्याचा स्वीकार होऊ लागला आहे. त्याचा स्वीकार करण्यास केवळ मुसलमान समाजाचाच धर्मनिष्ठ विरोध आहे असेही नाही. मुसलमानांसह सर्वांनी त्याची निकड ओळखून लौकरात लौकर स्वीकार करावा यासाठी काय काय केले पाहिजे त्याचा विचार, पुन्हा एकदा, तपशीलात जाऊन केला पाहिजे. संततिनियमन ही कायद्याने बंधनकारक करता येण्यासारखी गोष्ट आहे असे मला वाटत नाही. काही प्रलोभनात्मक व प्रतिबंधात्मक उपाय करता येण्यासारखे आहेत. ते सर्वांना धर्मनिरपेक्षरीत्या लागू करावेत याचा आग्रही श्री. गाडगीळांबरोबरच मी पण राखीन.

मुस्लिम जातीयवादाविरुद्धची नैसर्गिक प्रतिक्रिया म्हणून हिंदू जातीयवाद निर्माण झाला हे श्री. गाडगीळांचे मत आहे, अनेकांचे ते मत आहे, पण तेवढ्याने ते सत्य आहे असे ठरत नाही. स्वातंत्र्य मिळण्यापूर्वीच्या वेळेपासून हिंदूंच्या दृष्टीने - काँग्रेसी हिंदूंच्या दृष्टीनेही - ते एक सोयीचे मत होते. कारण मग लीगी राजकारण हे सर्वस्वी स्वयंभू पाप आहे असे मानता येत होते. पण सत्य यापेक्षा खूप गुंतागुंतीचे आहे ही गोष्ट, जे. एच. ब्रूमफील्ड यांचे 'एलिट कॉन्फ्लिक्ट इन अ प्ल्यूरल सोसायटी' हे एकच पुस्तक वाचले तरी गाडगीळांच्या लक्षात येईल. येथे त्याच्या खोलात जाता येणार नाही, पण हा विषय घेऊन गतइतिहासाचे परिशीलन करावयाचे असल्यास श्री. गाडगीळ यांचे बरोबर त्यांच्या सहकार्याने ते करण्याची माझी तयारी आहे.

आणखी एक गोष्ट ते विसरतात. 'हिंदू जातीयवाद ही मूळ क्रिया आहे आणि ती बंद पडली की त्याची नैसर्गिक प्रतिक्रिया म्हणून निर्माण झालेला मुस्लिम जातीयवाद आपोआपच बंद पडेल' असेच नेमके (श्री. गाडगीळ व मी ज्यांना) जातीयवादी मुस्लिम राजकारणी म्हणतो त्यांचे प्रतिपादन आहे. आणि बहुजन मुस्लिम समाज ते मत प्रामाणिकपणे ग्राह्य मानतो; हिंदूंच्या बाजूला, हिंदुत्ववादी राजकारणी व बहुजन हिंदू समाज यांचा प्रकार असाच आहे. मुसलमानांच्या मताची सत्यता अमूक अमूक पद्धतीने तपासून पाहिली पाहिजे असे श्री. गाडगीळांनी म्हटले पाहिजे आणि तीच पद्धत (आणि त्याच कसोट्या) स्वतःच्या मतासही लावली पाहिजे. अशा परीक्षेत जे टिकेल ते सत्य असे मानण्यास तयार असले पाहिजे. 'आमचे मतच सत्य आहे’ असा केवळ आग्रह राखून दोन्ही पक्ष राहिले तर डोकी फोडण्याचाच मार्ग उरतो. त्यात जो विजयी होतो त्याची बाजू सत्य आहे असे तरीही ठरत नाही.

हिंदूंना घटनेने दिलेले धर्मस्वातंत्र्य उपभोगता येत नाही हा श्री. गाडगीळांचा आरोप टिकणारा नाही. त्यांनी भिवंडी-जळगावचा उल्लेख केला आहे. जळगावची दंगल धर्मस्वातंत्र्याच्या हक्काशी कोणत्याही प्रकारे संबंधित नसावी असे सर्वमतांच्या स्थानिक मंडळींच्या सांगण्यावरून वाटते. (मी तेथे गेलो आहे.) भिवंडीच्या बाबतीत, धर्मस्वातंत्र्याचा हक्क सार्वजनिक जागी कसा उपभोगावयाचा यावरूनच्या सर्वस्वी गैर व हिंसक भूमिकेतून - दोन्ही जमातीत अशी गैर व हिंसक भूमिका घेणारी मंडळी होती असे दिसते - दंगल झाली. धर्मस्वातंत्र्याचा हक्क हा इतरधर्मीयांच्या धर्मस्वातंत्र्याचा आदर करून, शेजारधर्माचे पालन करून कसा उपभोगावयाचा त्याची रीत व संकेत, आपण बहुसंख्य आहोत या आधारे, हिंदू आपल्या मनाप्रमाणे ठरवू शकत नाही. या गोष्टी या देशातील सर्वच नागरिकांचे प्रतिनिधित्व करणाऱ्या विधानसभा-लोकसभा यांनी, केवळ तेथील बहुमताच्या जोरावर नव्हे तर बहुमत अधिक काही मूलभूत लोकशाही मूल्यांची चौकट याआधारे ठरवावयाच्या आहेत. आणि त्यांचे पालन त्या त्या वेळच्या प्रस्थापित शासनाने करावयाचे आहे. ब्रिटिश राजवटीत मान्य झालेल्या रीती व संकेत बुद्धिपुरस्सर अलगपणास उत्तेजन व बळकटी देणाऱ्या होत्या आणि म्हणून त्या आता बदलायला झाल्या आहेत हे मुसलमानांना व इतरही धार्मिक-सांस्कृतिक गटांना ठामपणे सांगितले पाहिजे याबाबतीत श्री. गाडगीळ व मी सहमत आहोत. पण हा बदल लोकसंमतीने - साधारण ऐक्यमताने -

झाला पाहिजे, विधानसभा-लोकसभा हेच त्याचे एकमेव माध्यम असले पाहिजे, आणि त्याचे पालन हे शासनयंत्रणेच्या मार्फतच झाले पाहिजे या गोष्टींचा आग्रह श्री. गाडगीळांनी ठेवायला हवा असे मला वाटते. या मर्यादांच्या पलीकडे जाऊन, बैठकीमध्ये ठरलेल्या गोष्टींना हरताळ फासून आपला धर्मस्वातंत्र्याचा हक्क मन मानेल तसा उपभोगू पाहणाऱ्यांची गय श्री. गाडगीळांनी करता कामा नये - मग ज्यांच्या मताशी ते एरवी सहमत आहेत असे ते हिंदू का असेनात. हिंदू-मुस्लिम उभयतांना त्याच समान तत्त्वांनुसार, मूल्यांनुसार, सारख्याच कठोरपणे वागविण्याचे, त्यांचा निवाडा करण्याचे पथ्य श्री. गाडगीळांनी पाळले तरच ते मुस्लिमांना समरस करून घेण्याच्या मार्गातील मुसलमानांच्या बाजूने असलेले अडथळे दूर करण्यास मुसलमानांचे मन वळवू शकतील, कारण त्यावेळी श्री. गाडगीळ आपणास या देशाचे समान नागरिक म्हणून वागवीत आहेत याविषयी मुसलमानांचा विश्वास त्यांनी संपादन केलेला असेल.

गरीब म्हणून, अपंग म्हणून द्यावे, पण मुसलमान म्हणून कोणास झुकते माप द्यावे अशा मताचा मी नाही. पण कोणत्याही देशातील बहुसंख्याक जमातीला, ती बहुसंख्याक आहे म्हणूनच, काही विशेष जबाबदारी ही, इतर अल्पसंख्य जमातींवर कोणत्याही अटी न लावता, बिनशर्त आधी उचलावी लागते, पार पाडावी लागते. भारताचे नागरिकत्व पत्करलेला प्रत्येकजण, प्रत्येक समूह हा त्याच्या गुणदोषांसहित मत-मतांतरासहित आम्ही या देशाचा म्हणून स्वीकारतो, त्या सर्वांना मूलभूत स्वातंत्र्याची हमी देतो, त्यांना कायम अभय व संरक्षण देतो हा विश्वास देण्याची जबाबदारी भारतात हिंदूंची आहे, इंग्लंडमध्ये इंग्लिश लोकांची आहे, अमेरिकेत गौरवर्णियांची आहे. याला फक्त (कायद्याच्या संहितेप्रमाणे) राष्ट्रद्रोही व गुन्हेगारी कृत्ये करणाऱ्यांचा काही प्रमाणात अपवाद आहे. मात्र अशाही नागरिकांना शिक्षा ही कायद्याच्या आधारे शासनानेच द्यावयाची असते व ती शिक्षा देतानाही शासन त्याला आधी तो नागरिक आहे असे मान्य करूनच कायदा लावीत असते हे ध्यानात ठेवले पाहिजे. आणि म्हणून पंतप्रधान इंदिरा गांधींचे म्हणणे योग्यच आहे. अयोग्य आहेत त्या त्यांच्या इतर काही कृती.

माझ्या मते समान नागरी कायदा, सार्वजनिकरीत्या धर्मस्वातंत्र्य उपभोगण्याच्या रीती व संकेत, समरस राजकारण, सामाजिक सुधारणा, या सर्व बाबींसंबंधी नव्याने, उदार व एकात्म भूमिका घेण्यास उत्सुक असलेला एक तरुण वर्ग मुसलमान समाजात अस्तित्वात आहे. पण तो पुढे यावयाचा असेल, मुसलमान समाजाचे नेतृत्व जुन्या मंडळींच्या हातून हिसकावून घेण्यास त्याला यश यावयाचे असेल तर हिंदू समाजाने, तो बहुसंख्याक आहे म्हणूनच, अभयाचे व विश्वासाचे वातावरण निर्माण केले पाहिजे आणि मुस्लिम नेतृत्व व समाज कसे वागतात यांवर अवलंबून न ठेवता ते केले पाहिजे.